महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (वरिष्ठ) या संवर्गातील श्री. पी. टी. देवतळे, सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन आदेश क्र.परिवि-२०२२/प्र.क्र.१५७ /व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मुख्य इमारत, दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : ०४ मे , २०२२.**

संदर्भ:- (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि २७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि. २९/२/२०१६.
(२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन आदेश क्र.व्यशिअ-२०१५/प्र.क्र.३०९/व्यशि-१, दि. २३/११/२०१५.
(३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.०३/आस्था-१/परिविक्षाधीन/२०१९/१३६, दि. ३१/१२/२०१९.

**प्रस्तावना:-**

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (व.) या संवर्गातील श्री. पी. टी. देवतळे, सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर यांची दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीकरिता संदर्भ क्र. (२) येथील शासन आदेशान्वये प्रथम नियुक्ती करण्यात आली होती.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ, (व.) या संवर्गातील श्री. देवतळे यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने, त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

श्री. पी. टी. देवतळे, सह संचालक यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केल्या असल्याने, त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील पुढील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.५ येथे नमूद दिनांकास समाप्त करण्यात येत आहे. तसेच, त्यांच्यावर सुरु असलेल्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीवर परिवीक्षाधीन कालावधी संपविण्याच्या आदेशाचा परिणाम होणार नाही. यास्तव त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याच्या दिनांक स्तंभ क्र.६ येथे नमूद करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | नाव व पदनाम | रुजू दिनांक | परिवीक्षाधीन कालावधी पुढे ढकलण्याचे कारण | परिवीक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक. |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | श्री.पी. टी. देवतळे, सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर. | ०१/१२/२०१५ | निरंक | ३०/११/२०१७ | ०१/१२/२०१७ |

२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर अधिकाऱ्याच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने नियमानुसार तात्काळ उचित कार्यवाही करावी.

३. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवि २७१५/प्र.क्र.३०२/आठ, दि. २९/२/२०१६ मधील तरतुदीन्वये व शासन निर्णय क्र.परिवि-२७१५/प्र.क्र.२०३ /आठ, दि. २५/८/२०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकार तसेच सामान्य प्रशासन विभाग, अनौ. संदर्भ क्र.४९/का.८, दि.०२/०२/२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०५०४१४५३००१४०३ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9, pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2022.05.04 14:53:35 +05'30'

**(प्रदीप सा. शिवतरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२ , महाराष्ट्र /नागपूर.
३) महालेखापाल, लेखा परीक्षा व अनुज्ञेयता, १/२ , महाराष्ट्र /नागपूर.
४) सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
६) संबंधित अधिकारी.
७) निवडनस्ती.